**बेर्डेवाडी लघु पाटबंधारे योजना, तालुका लांजा, जिल्हा रत्नागिरी, या योजनेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१८/(प्र.क्र. ७/२०१८)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १३ फेब्रुवारी, २०१९.

**पहावे:-** १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोपाविम/तां-३/बेर्डेवाडी/४२८३, दिनांक २६/१२/२०१७

२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे क्रमांक व्यअस-२०१८/प्र.क्र.८७/अर्थसं-२, दिनांक २०/११/२०१८ चे पत्र व त्यासोबतचे इतिवृत्त.

**प्रस्तावना-**

बेर्डेवाडी लघु पाटबंधारे योजना, तालुका लांजा, जिल्हा रत्नागिरी, या योजनेस शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्रमांक बीआरडब्ल्यू/१०८२/२२८/(११/८३)/ए.एस.ए-३, दिनांक १५/०९/१९८३ अन्वये एकूण रुपये ३.७४ कोटी किंमतीस (दरसूची १९८२-८३) मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर या योजनेस शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्रमांक एम.आय./१२९५/(३५६/९५)/खारभूमी, दिनांक ०१/०८/१९९७ अन्वये एकूण रुपये २२.८७ कोटी किंमतीस (दरसूची १९९५-९६) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर या योजनेस शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्रमांक लपायो/२००८/(३४७/२००८)/खारभूमी, दिनांक ०२/०३/२००९ अन्वये एकूण रुपये ६३.०८ कोटी किंमतीस (दरसूची २००७-०८) उंचीवाढीसह द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी संदर्भीय पत्र क्रमांक १ अन्वये तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रकल्पास तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनस्तरावर विचाराधीन होते. त्याबाबत आता पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

आता या निर्णयान्वये बेर्डेवाडी लघु पाटबंधारे योजना, तालुका लांजा, जिल्हा रत्नागिरी, या योजनेच्या एकूण अंदाजित खर्च रुपये १४०.४९ कोटी (रुपये एकशे चाळीस पूर्णांक एकोणपन्नास शतांश कोटी फक्त) या किंमतीस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर किंमतीमध्ये कामाकरिता एकूण रूपये १२५.५६ कोटी (रुपये एकशे पंचवीस पूर्णांक छप्पन्न शतांश कोटी फक्त) व अनुषंगीक खर्च रूपये १४.९३कोटी (रुपये चौदा पूर्णांक त्र्याण्णव शतांश कोटी फक्त) एवढी

तरतूद आहे. उर्वरित कामासाठी सन २०१६-१७ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहे. उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविण्यात आला आहे.

सदर तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यन्वित करण्याच्या विविध टप्प्यांवर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही. सदर सुप्रमा देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर सुप्रमा प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.
२) या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पुढे चालू ठेवावी. सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.
३) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्त अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
४) सदर प्रकल्पाच्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.
५) संपूर्ण प्रकल्प हा सदर तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.
६) धरणाच्या वाढीव उंचीस कोकण रेल्वेकडून ना- हरकत प्रमाणपत्र (No Objection Certificate) प्राप्त करून घेण्यात यावे.

सदर प्रस्तावास नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारीक संदर्भ क्र. ६७/२०१८ दिनांक २३/०५/२०१८ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारीक संदर्भ क्र. २३१/२०१८ दि. २०/१०/२०१८ अन्वये नुसार सहमती दिलेली आहे. व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदरचा प्रस्ताव मान्य करण्यात आला असून संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबत प्रसृत करण्यात आलेल्या इतिवृत्तानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष, "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०- सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (००) (०३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली तृतीय सुधारित प्रशासकिय मान्यता १९५ या अनुक्रमांकावर नोंदवण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१३१६०८५८०२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2019.02.13 16:10:54 +05'30'

(मि. आ. वाणी)

**शासनाचे अवर सचिव**

**सहपत्र: परिशिष्ट 'अ'**

**प्रत,**

१. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
४. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहाय्यक
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
८. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
९. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१०.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
११.आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.जिल्हाधिकारी, नाशिक.
१३.अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
१४.कक्ष अधिकारी, अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी, निवसं-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
१७.खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : सुप्रमा २०१८/प्र.क्र. ७/२०१८) /खारभूमी, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

**दिनांक १३/०२/२०१९ चे परिशिष्ट- अ**

**बेर्डेवाडी लघु पाटबंधारे योजना, तालुका लांजा, जिल्हा रत्नागिरी तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता उपशीर्षनिहाय तरतुदी**

**(रूपये लक्ष)**

| अ.क्र. | उपशीर्ष | मंजूर द्वितीय सुप्रमानुसार तरतुद | तृतीय सुप्रमा नुसार तरतुद |
|---|---|---|---|
| **अ) शीर्षकामे** | | | |
| १ | ए-प्राथमिक | २१.६४ | ३४.१४ |
| २ | बी-भूसंपादन | १२६.५७ | ७९४.८६ |
| ३ | सी- मुख्य कामे | ४५०४.३५ | ८३३१.५४ |
| ४ | डी-विमोचक | २४०.०३ | ४८९.०३ |
| ५ | एफ- आरएचटी वर्क्स | ३.०० | ०.०० |
| ६ | के-इमारती | २४.५६ | ३४.५६ |
| ७ | एम-वृक्षारोपण | ०.७५ | ९.२३ |
| ८ | ओ-संकीर्ण | ४.४२ | ९१.०० |
| ९ | पी-देखभाल दुरूस्ती | १३.८८ | २८.८७ |
| १० | आर- रस्ते | ३०.५७ | ३२.५९ |
| | **एकूण शीर्षकामे (अ)** | **४९७२.७७** | **९८४८.८२** |
| **(ब) कालवे व वितरण व्यवस्था** | | | |
| १ | ए-प्राथमिक | ७५.६६ | १०४.६२ |
| २ | बी-भूसंपादन | १२५.११ | ७२३.४९ |
| ३ | डी-विमोचक | १८.९१ | १७.७८ |
| ४ | इ- प्रपात | ४.०७ | ७.२१ |
| ५ | एफ़- मो-यांची कामे | २९३.१६ | ७२८.५७ |
| ६ | जी- पूल | २८.९८ | ८५.२१ |
| ७ | एच- निकासी | ९.८३ | ३९.२२ |
| ८ | एल-मातीकामे | २२४.२० | ७६८.०१ |
| ९ | एम-वृक्षारोपण | १.०८ | २३.७६ |
| १० | ओ-संकीर्ण | ८.०४ | ६.७४ |
| ११ | पी-देखभाल दुरूस्ती | ३.७९ | १४.१२ |
| १२ | आर- रस्ते | १.०० | १.०० |
| १३ | यू-वितरीका | २१.६२ | १८७.२७ |
| | **एकूण कालवे व वितरण व्यवस्था (ब)** | **८१५.४६** | **२७०६.९९** |
| | **एकूण कामे क = ( अ + ब)** | **५७८८.२२** | **१२५५५.८१** |
| | **ड = आस्थापना व इतर कामे** | ५२३.२१ | १४९३.६० |
| | **एकूण एकंदर ( क+ ड)** | **६३०८.४३** | **१४०४९.४०** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र (ICA) १०८१ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २१.६८ दलघमी आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ६४,८०४/- < १,३८,६०४/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.१९ > १

इ) आर्थिक परतावा दर ९.४५% < १२

Milind
Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2019.02.13 16:11:59 +05'30'

( मि. आ. वाणी )
**शासनाचे अवर सचिव**